श्री शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे या क्रीडा संकुलाच्या दैनंदिन देखभाल दुरुस्तीच्या खर्चासाठी सन २०२४-२५ साठी निधी मंजूर करुन वितरीत करणेबाबत- लेखाशिर्ष (२२०४-१७०२).

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रिडायो ३३२५/प्र.क्र.१८/क्रीयुसे-१,**
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
तारीख: २७ मार्च , २०२५

**वाचा :-**

१) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र. शशिम/१०९५/ प्र.क्र. १६६/क्रीयुसे-३ दिनांक १८.११.१९९५
२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे, यांचे क्र.शिक्रीसं/निविप्र/१७०२/२०२४/ का-११/४०६५ दिनांक २३/१/२०२५.
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र ८०/अर्थ-३, दिनांक १७/२/२०२५

**प्रस्तावना :-**

श्री. शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे या क्रीडा संकुलाच्या दैनंदिन देखभाल दुरुस्तीच्या खर्चासाठी सन २०२४-२५ साठी निधी मागणीचा प्रस्ताव संदर्भ क्र.२ अन्वये आयुक्त, क्रीडा यांनी सादर केला आहे. यानुषंगाने संबंधित लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ करिता अर्थसंकल्पित तरतूदीतून श्री शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे या संकुलाच्या दैंनदिन देखभाल दुरुस्तीकरिता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

श्री. शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे या क्रीडा संकुलाच्या दैनंदिन देखभाल व दुरुस्तीकरिता सन २०२४-२५ या वर्षाकरिता अर्थसंकल्पित तरतूदीमधून रु.५,८१,७९,४२३/-इतका निधी मंजूर करण्यात येत आहे. सदर खर्चाचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | खर्चाची बाब | अपेक्षित अंदाजे खर्च रुपये. |
|---|---|---|
| १ | वीज देयक | ३,१४,७२,०९०.०० |
| २ | सुरक्ष व्यवस्था पाणी देयक | १,१५,६२,३२०.०० |
| ३ | मनुष्यबळ पुरवठा -दैनंदिन साफ-सफाई | १,०१,५४,७७८.०० |
| ४ | जलतरण तलावाची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती | ४९,९०,२३५.०० |
| | एकूण: | ५,८१,७९,४२३.०० |
| | (अक्षरी रुपये पाच कोटी एक्क्याऐंशी लक्ष एकोणऐंशी हजार चारशे तेवीस फक्त.) | |

२. उपरोक्त निधी वितरीत करण्यास खालील अटींच्या अधीन राहून वित्तीय मान्यता देण्यात येत आहे:-

i. निधी ज्या प्रयोजनाकरिता मंजूर करण्यात आला आहे, त्या प्रयोजनार्थ खर्च करण्यात यावा.

ii. निधीचा विनियोग झाल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

iii. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

iv. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. त्याव्यतिरिक्त इतर उद्देशासाठी खर्च करता येणार नाही. तसेच, निधी इतर लेखाशिर्षाकडे वळविता येणार नाही.

v. वित्त विभाग दिनांक १२.२.२०२५ व दि.१७.३.२०२५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. तसेच राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील तरतूदी यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त मंजूर निधी “मागणी क्र. ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०१) क्रीडा संकुलांची स्थापना (२२०४ १७०२), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.९६/१४७१, दि.१३/२/२०२५ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.२४६/व्यय-५, दि.३/३/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१३१२५०५५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING
ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.03.27 13:14:28 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालाचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री ( नगर विकास व गृहनिर्माण ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७. सर्व सन्मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, (अ.का.) क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
९. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१०. मा. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
११. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. जिल्हा कोषगार अधिकारी, पुणे (संचालनालयामार्फत)
१३. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१५. नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१६. अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा, मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१).